**उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील श्रेणीवर्धीत स्त्री रुग्णालय, परभणी, जि.परभणी येथील नवनिर्मित १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२३/प्र.क्र.२०३/आरोग्य-४**
१० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई
तारीख: ११ सप्टेंबर, २०२३

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदनिर्मिती-२०२२/प्र.क्र.१५४/आरोग्य-३अ, दिनांक २३.०६.२०२२.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १८.०८.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांचा प्रस्ताव क्र.आसेआ/कक्ष-३/टे-०८/स्त्री रुग्णालय परभणी/अपदेमुदतवाढ/८०२५-२७/२३, दिनांक १०.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील श्रेणीवर्धीत स्त्री रुग्णालय, परभणी, जि.परभणी येथील नवनिर्मित १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा आयुक्तालयाकडून प्राप्त प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांच्या अधिपत्याखालील श्रेणीवर्धीत स्त्री रुग्णालय, परभणी, जि.परभणी येथील नवनिर्मित १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा आयुक्तालयाकडून प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या स्त्री रुग्णालय परभणी येथील १० अस्थायी पदांना दिनांक २३.१२.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२३-२४ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र.आर-१,
२२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा,
११०-रुग्णालये व दवाखाने,
११०-७- पंचवार्षिक योजनांतर्गत राज्य योजना- राज्य योजनांतर्गत योजना,
(०६) (०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने
(२२१० ०२२६)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १८.०८.२०२२ व दिनांक ०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३११५४४३९८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT,
2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.09.11 15:05:51 +05'30'

( अ. मा. आत्राम )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

७. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, परभणी
९. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
१०.वित्त विभाग ( कार्यासन /व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२३/प्र.क्र.२०३/आरोग्य-४, दिनांक ११.०९.२०२३ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | स्त्री रुग्णालय, परभणी | १० | ०० | क्ष-किरण शास्त्रज्ञ वर्ग-१ (१ पद)<br>वैद्यकीय अधिकारी, गट-अ (५ पदे)<br>प्रशासकीय अधिकारी, गट-ब (१ पद)<br>बालरोग परिचारिका (२ पदे)<br>रक्तपेढी तंत्रज्ञ (१ पद) |